(वितरण आदेश क्रमांक-१०)

सन २०१६-१७ व २०१७-१८ या वर्षामधील महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानासाठी MKSP करिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी (General) प्रलंबित अर्थसहाय्य.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः मजिअ - २०१९/प्र.क्र.१७३/योजना-३
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०२ डिसेंबर, २०१९.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.एमकेएसपी-२०१३/प्र.क्र.२६६/ योजना-३, दिनांक १७ डिसेंबर, २०१३.
२. केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र.के-११०११/०९/२०१६/एमकेएसपी/ एएपी/महा, दिनांक ०१ मार्च, २०१८ चे वितरण आदेश.
३. केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र.के-११०११/०९/२०१६/एमकेएसपी/ एएपी/महा, दिनांक ०४ ऑगस्ट २०१८ चे वितरण आदेश.
४. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.मजिअ-२०१७/प्र.क्र.२७/योजना-३, दिनांक ०९ मार्च, २०१७ व ३१ मार्च, २०१७.
५. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.मजिअ-२०१७/प्र.क्र.१२३/योजना-३, दिनांक २६ मार्च, २०१८.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र. एमएसआरएलएम/लेखा/ ४०५४ व ४०५५/२०१९, दिनांक ०५ नोव्हेंबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०१६-१७ व २०१७-१८ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास महिला किसान सशक्तीकरण परियोजनेच्या सर्वसाधारण प्रवर्गासाठी (General) अर्थसहाय्य या योजनेकरिता निधी वितरीत केलेला आहे. सदर निधी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाच्या बँक खात्यात थेट जमा केला आहे. त्यामुळे सन २०१६-१७ व २०१७-१८ मधील सदर केंद्र हिस्सा रु.५०२.४० लाख व रु.१००४.८० लाख च्या समरुप राज्य हिस्सा रु.३३४.९३३३३ लाख व रु.६६९.८७ लाख पैकी अनुक्रमे रु.३३४.९३ लाख व रु.६५२.६० लाख एवढा निधी दिनांक ०९ मार्च, २०१७ व ३१ मार्च, २०१७ तसेच २६ मार्च, २०१८ च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आला आहे. उर्वरित रु.१७,२७,३३३/- इतका निधी वितरित करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. सन २०१९-२०२० मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत महिला किसान सशक्तीकरण परियोजनेच्या सर्वसाधारण प्रवर्गासाठी (Genral)) राज्य हिस्सा (२५०१ २८३७) याकरिता केलेल्या तरतूदीतून सन २०१६-१७ व २०१७-१८ मधील प्रलंबित निधी रु.१७,२७,३३३/- (रुपये सतरा लाख सत्तावीस हजार तीनशे तेहतीस फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

३. सदर खर्च "मागणी क्र.एल-३, २५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वरोजगार कार्यक्रम, १०१, स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना, (०१) स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना, (०१) (०८) आजिविका (एमएसआरएलएम) अंतर्गत महिला किसान सशक्तीकरण परियोजनेस वित्तीय सहाय्य (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम), ३३, अर्थसहाय्य (२५०१ २८३७)" या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२०२० मध्ये केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

४. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभाग यांचेकडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक्र दिनांक ८ जुलै, २०१९ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित करण्याच्या प्रदान केलेल्या अधिकारानुसार दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०२१०४०३६५७२० असा आहे. हा आदेश

डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, serialNumber=6721aca60d5973c4d26547269488f4f9d7c98360213c1a8ca7eccc36b35448ff, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2019.12.03 10:27:43 +05'30'

( दि. बा. पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर (पाच जादा प्रतींसह)
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
३) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे,
५) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
६) कक्ष अधिकारी (विघयो) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७) वित्त विभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१७) मंत्रालय मुंबई-३२.
८) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
९) निवडनस्ती.